71\D:\TRA-4\TRA-5- mct 0403-723.lwp

**पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व अतिरिक्त जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश,श्रीरामपूर, जि. अहमदनगर यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक : एमसीटी-१२०३/१६५३/सीआर-२०८/परि-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक १९ मे, २००४

**वाचा :-** १) शासन अधिसूचना, गृह विभाग क्र.एमसीटी-०४९८/प्र.क्र.२३ (ब)/परि-५, दि.३१.८.२०००
२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, अहमदनगर यांचे पत्र क्र.१५८७/२००३, दि. ६.१०.२००३
३) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) यांचे पत्र क्र.ए/१२२४/८०/२००२, दिनांक ३०.१०.२००३

**शासन निर्णय :-** मोटार वाहन कायदा, १९८८ (१९८८ चा ५९) च्या कलम १६५ (२) च्या अधिकारानुसार शासन अधिसूचना, गृह विभाग क्र.एमसीटी- ०४९८/सीआर-२३ (अ)/परि-५, दि.११.८.२०००, अन्वये श्रीरामपूर जिल्हा अहमदनगर येथे मोटार अपघाताचे दावे चालविण्यासाठी एक सदस्यीय मोटार अपघात दावा न्यायाधिकरण स्थापण्यात आले आहे व अतिरिक्त जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, अहमदनगर यांची या न्यायाधिकरणावर पदसिध्द सदस्य म्हणून नेमणूक केली आहे. आता या आदेशान्वये पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, श्रीरामपूर , जिल्हा अहमदनगर यांना या न्यायाधिकरणाचे कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११.७.२००१ मधील अ.क्र.३ वरील नियम क्रमांक.२ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आ. बा. कमाळे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्रान्वये)
जिल्हा व सत्र न्यायाधिश, अहमदनगर,
अतिरिक्त जिल्हा न्यायाधिश व पदसिध्द सदस्य,मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, श्रीरामपूर, जि. अहमदनगर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
उप कोषागार अधिकारी, श्रीरामपूर, जि. अहमदनगर,
विधी व न्याय विभाग, कार्यासन-१२/कार्यासन-३, मंत्रालय, मुंबई-३२,
वित्त विभाग, ( विनियम/ व्यय ८) मंत्रालय,मुंबई-३२,
निवडनस्ती, परिवहन-५.